सन २०१७, २०१८ व २०१९ या वर्षातील विविध कृषि पुरस्कार विजेते शेतकऱ्यांचा सत्कार करण्याकरिता आयोजित करावयाच्या पुरस्कार वितरण सोहळ्यासाठी उपलब्ध करून दिलेल्या रु.२५०.७० लाख निधीपैकी रु.१३१.८३ लाख निधी संक्षिप्त देयकांद्वारे आहरित करण्यास मंजूरी देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- पुरस्कार -२०२१/प्र.क्र.११६/४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२

**दिनांक : २८ एप्रिल, २०२२**

संदर्भ:-

१) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पुरस्कार-२०२१/प्र.क्र.११६/४-अे, दि.०८/०४/२०२२

२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पुरस्कार-२०२१/प्र.क्र.११६/४-अे, दि.१९/०४/२०२२

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषि, कृषि संलग्न क्षेत्र तसेच फलोत्पादन क्षेत्रामध्ये उल्लेखनीय कार्य करणाऱ्या शेतकरी व संस्था यांना सन २०१७, २०१८ व २०१९ या वर्षातील विविध कृषि पुरस्कार वितरीत करण्याकरिता आयोजित करावयाच्या पुरस्कार वितरण सोहळ्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये रु.२५०.७० लाख निधी कृषि आयुक्त कार्यालयास उपलब्ध करून देण्यात आलेला आहे. या पुरस्कार वितरण कार्यक्रमासाठी समारंभस्थळी करावयाच्या विविध व्यवस्था व सुविधांसाठी उपलब्ध करून दिलेल्या रु.२५०.७० लाख निधीपैकी रु.१३१.८३ लाख निधी, लेखा अधिकारी तथा आहरंण व संवितरण अधिकारी, जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी कार्यालय नाशिक यांना संक्षिप्त देयकांद्वारे आहरित करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. संदर्भाधिन शासन निर्णयांन्वये कृषि पुरस्कार वितरण समारंभासाठी शेतक-यांची निवास व्यवस्था, भोजन, वाहतूक व्यवस्था, सभामंडप तसेच समारंभासाठी अन्य अनुषंगिक व्यवस्था व सुविधांसाठी उपलब्ध करून दिलेल्या रु.२५०.७० लाख निधीपैकी रु.१३१.८३ लाख निधी लेखा अधिकारी तथा आहरंण व संवितरण अधिकारी, जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी कार्यालय नाशिक यांना संक्षिप्त देयकांद्वारे आहरित करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

i) शासन परिपत्रक क्र.मुंविनि-२०१७/प्र.क्र.३८/१७/विनियम, दि.१८/१२/२०१७ मधील सूचनेनुसार “लेखाशीर्ष २४०१ ०७५३-५०, इतर खर्च” या लेखाशिर्षाखालील दि.२८/०३/२०२२ पर्यंतची तपशीलवार देयके प्रलंबित नाहीत.

ii) दि.२८/०३/२०२२ नंतरच्या तपशीलवार देयकांचा त्वरेने निपटारा करण्यात येईल.

iii) या संक्षिप्त देयकांचे तपशीलवार देयक एका महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.

iv) खर्च नियमित देयकांद्वारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकांवर रक्कम काढणे अनिवार्य आहे.

v) या संक्षिप्त देयकांचे तपशीलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची जबाबदारी लेखा अधिकारी तथा आहरंण व संवितरण अधिकारी, जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी कार्यालय नाशिक यांची राहील.

vi) मासिक निधी विवरणपत्रानुसार याकरिता निधी उपलब्ध आहे.

२. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८०/२०२२/विनियम, दि.२८/०४/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४२८१८३२५६९७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2022.04.28 18:34:12 +05'30'

**(महेंद्र घाडगे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति -**

१. मा. मंत्री (कृषि)यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
११. विभागीय कृषी सहसंचालक, ठाणे व नाशिक
१२. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, नाशिक
१३. महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१४. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६. जिल्हा कोषागार अधिकारी पुणे, ठाणे व नाशिक
१७. सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
१८. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
१९. निवड नस्ती-४अे